**महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई खंडपीठ नागपूर व पुणे येथील वर्ग-२, ३ व ४ ची ३२ अस्थायी पदे दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यत पुढे चालू ठेवण्याबाबत...........**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. राजस-२०२४/प्र.क्र.५२/५ स**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- १३ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५स, दि.५/५/२०११

२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-२०२२/प्र.क्र.९१/५स, दि.४/१०/२०२३

३) सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र. . आस्था/कक्ष-१/सह.न्याया/अस्थायी पदे/ मुदतवाढ/२०२४, दि.६/३/२०२४

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/२/२०२४

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई खंडपीठ नागपूर व पुणे येथील वर्ग-२, ३ व ४ ची ३२ अस्थायी पदे संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद दि.४/१०/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.२९/२/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती. प्रशासकीय कारणास्तव सदर अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असून, त्यांना सन २०२३-२०२४ करीता मुदतवाढ मिळणे आवश्यक आहे. सदर ३२ अस्थायी पदांना दि.१/३/२०२४ ते दि.२८/२/२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.३ येथे नमूद दि.६/३/२०२४ रोजीच्या पत्रान्वये विनंती केली आहे.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील पदांच्या सुधारीत आकृतिबंधास उच्चस्तर सचिव समितीने दि.२१/१/२०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्यानुसार सुधारीत आकृतिबंधाचा शासन निर्णय दि.५/५/२०११ रोजी निर्गमित करण्यात आला असून सुधारीत आकृतिबंधामध्ये उक्त अस्थायी पदांचा समावेश आहे. वित्त विभागाच्या दि.१/९/२००४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आकृतीबंधाचा दर तीन वर्षानी आढावा घेणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन निर्णय दि.५/५/२०११ नुसार निर्गमित केलेल्या आकृतीबंधास दि.५/५/२०१४ रोजी तीन वर्षे पूर्ण झाली आहेत. सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव मा.मुख्यसचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीच्या मान्यतेस्तव वित्त विभागास सादर करण्याची कार्यवाही सुरु आहे.

वित्त विभाग शासन निर्णय, दि.२१/२/२०२४ नुसार सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ या कालावधीत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. दरम्यानच्या काळात

सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी दक्षता घ्यावी अशी बाबही शासन निर्णयात नमुद केली आहे.

सबब, शासन निर्णय दि.५/५/२०११ अन्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधात उक्त पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई खंडपीठ नागपूर व पुणे येथील वर्ग- ३ व ४ ची ३२ अस्थायी पदांना दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे. सदर पदांची विगतवारी सोबतच्या विवरणपत्रात दर्शविली आहे.

२. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक व्ही-२, ०१-सहकार, ००१-संचालन व प्रशासन, (०१) संचालन व प्रशासन (०१) (०९) महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय (२४२५ ०१०२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२०२५ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय दि.२१/२/२०२४ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०२४०३१३११३०३१६५०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2024.03.13 11:39:33 +05'30'

**( अनिल चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई.
२. विभागीय सहनिबंध सहकारी संस्था (प्रशासन), पुणे/नागपूर
३. सदस्य, महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई खंडपीठ पुणे / नागपूर द्वारा- प्रबंधक महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे /नागपूर.
८. वित्त विभाग (व्यय - २ / अर्थसंकल्प - १९), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव १५-स / १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती - कार्यासन ५स.

**शासन निर्णय क्र. राजस-२०२४/प्र.क्र.५२/५ स, दि. १३ मार्च, २०२४ सोबतचे प्रपत्र “अ”**

| अ क्र | हुददा | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| **१** | **निबंधक /अप्पर निबंधक वर्ग- २.** | **५६१००-१७७५०** | **१** |
| वर्ग- ३/४ | | | |
| १ | कार्यालय अधिक्षक | ३८६००- १२२८०० | १ |
| २ | लघुलेखक नि. श्रेणी | ३८६००-१२२८०० | २ |
| ३ | शिरस्तेदार | ३५४००-११२४०० | २ |
| ४ | लेखापाल | ३५४००-११२४०० | १ |
| ५ | वरिष्ठ लिपिक | २५५००-८११०० | २ |
| ६ | टंकलेखक | १९९००-६३२०० | १ |
| ७ | वाहन चालक | १९९००-६३२०० | १ |
| ८ | शिपाई | १६६००-५२४०० | १ |
| | **एकुण** | | **१२** |
| | वर्ग -३ / ४ | | |
| १ | लघुलेखक नि. श्रेणी | ३८६००-१२२८०० | १ |
| २ | मुख्य लिपिक | ३५४००-११२४०० | १ |
| ३ | शिरस्तेदार | ३५४००-११२४०० | १ |
| ४ | कनिष्ठ लिपिक / टंकलेखक | १९९००-६३२०० | २ |
| ५ | शिपाई | १६६००-५२४०० | २ |
| | **एकुण** | | **७** |
| | वर्ग -३ / ४ | | |
| १ | लघुलेखक नि. श्रेणी | ३८६००-१२२८०० | १ |
| २ | मुख्य लिपिक | ३५४००-११२४०० | १ |
| ३ | शिरस्तेदार | ३५४००-११२४०० | १ |
| ४ | कनिष्ठ लिपिक / टंकलेखक | १९९००-६३२०० | २ |
| ५ | शिपाई | १६६००-५२४०० | २ |
| | **एकुण** | | **७** |
| | वर्ग -३ / ४ | | |
| १ | लघुलेखक नि. श्रेणी | ३८६००-१२२८०० | १ |
| २ | मुख्य लिपिक | ३५४००-११२४०० | १ |
| ३ | शिरस्तेदार | ३५४००-११२४०० | १ |
| ४ | कनिष्ठ लिपिक / टंकलेखक | १९९००-६३२०० | १ |
| ५ | शिपाई | १६६००-५२४०० | २ |
| | **एकुण** | | **६** |

**एकुण :- मुंबई १२ +नागपुर ७ + पुणे ७ + औरंगाबाद ६ = ३२**